राज्यातील कार्यरत अर्धवेळ ग्रंथपालांचे पूर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन (रूपांतरण) करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र.एसएसएन २०१८/प्र.क्र.२४३/१८/टीएनटी-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १३ एप्रिल, २०२३

**वाचा :**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. एसएसएन- १७०२/(९/२००२)/माशि-२, दिनांक ३ ऑगस्ट, २००६.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. एसएसएन-२०१८/(२४३/१८)/टीएनटी-२, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.

३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक शिक्षकेतर/टि-४/अ.ग्रं.उ./२०२२/१०१० दिनांक २४ फेब्रुवारी, २०२२

४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक शिक्षकेतर/टि-४/पू.ग्रं.उ.व स./२०२२/३६८२ दिनांक १ जून, २०२२

**प्रस्तावना:**

संदर्भाधिन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित शाळांमधील विहीत निकष पुर्ण करणाऱ्या ९२४ अर्धवेळ ग्रंथपालांचे पुर्णवेळ ग्रंथपालपदी रुपांतरीत करुन पुर्णवेळपदी उन्नयन करण्यात आलेले आहे. संदर्भाधिन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील कार्यरत अर्धवेळ ग्रंथपालांपैकी ५९६ अर्धवेळ ग्रंथपालांचे पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन करण्याचा निर्णय घेण्यात आला होता. तथापि, दिनांक २८/०१/२०१९ रोजीच्या शिक्षकेतर पदांच्या (चतुर्थ श्रेणी वगळून) आकृतीबंधान्वये पूर्णवेळ ग्रंथपाल पदाचे पटसंख्या निकष इ. ६वी ते १२वी मधील १००१ विद्यार्थी असा केला आहे. राज्यामध्ये पूर्णवेळ ग्रंथपाल अतिरिक्त ठरल्याने अर्धवेळ ग्रंथपालांचे पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन करणे शक्य झाले नाही. शासन निर्णय दिनांक २८/०१/२०१९ अन्वये राज्यातील खाजगी अनुदानित शाळांमधील शिक्षकेतर पदांचा (चतुर्थश्रेणी वगळून) आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. सदरहू आकृतीबंधान्वये इ.६वी ते १२वी मधील पटसंख्या १००१ पेक्षा अधिक असलेल्या शाळांमध्ये १ पूर्णवेळ ग्रंथपाल पद अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने राज्यामध्ये एकूण २११८ पूर्णवेळ ग्रंथपाल पदे मंजूर आहेत. त्याचप्रमाणे अर्धवेळ ग्रंथपाल हे पद मृत संवर्ग करण्यात आले असून सध्या कार्यरत असलेले अर्धवेळ ग्रंथपाल सेवानिवृत्त/मृत झाल्यानंतर ही पदे आपोआप व्यपगत होणार आहेत. तसेच अर्धवेळ ग्रंथपाल पदाचा संवर्ग मृत संवर्ग होत असल्याने यापुढे नवीन पदभरती अथवा पदनिर्मिती करण्यात येऊ नये असा निर्णय घेण्यात

आला आहे. सदरहू अर्धवेळ ग्रंथपाल हे मान्यताप्राप्त कर्मचारी आहेत. या अर्धवेळ ग्रंथपाल पदी कार्यरत कर्मचाऱ्यांना पूर्णवेळ कर्मचाऱ्यांप्रमाणे सेवेतील इतर लाभ मिळत नसल्याने तसेच अर्धवेळ ग्रंथपाल पद हे मृत संवर्ग झाल्याने त्याचप्रमाणे अर्धवेळ ग्रंथपालांच्या पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयनासाठी दीर्घकाळापासून होत असलेल्या मागणीच्या अनुषंगाने त्यांचे पूर्णवेळ ग्रंथपाल पदी रूपांतरीत करण्याची मागणी विविध लोकप्रतिनिधी तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी संघटना यांचेकडून वारंवार होत होती. त्या अनुषंगाने सद्यस्थितीत कार्यरत १२७६ अर्धवेळ ग्रंथपालांचे पूर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन (रूपांतरण) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये पूर्णवेळ ग्रंथपालांची एकूण २११८ मंजूर पदे आहेत. सद्यस्थितीत कार्यरत पदे साधारणपणे ९२६ असून, अर्धवेळ ग्रंथपालांच्या उन्नयन करण्यासाठी साधारणपणे ११९२ पदे उपलब्ध आहेत. राज्यातील सर्व अर्धवेळ ग्रंथपालांचे उपलब्ध असलेल्या पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन करावयाचे आहे. राज्यामध्ये सध्या २००० ते ३००० इतकी विद्यार्थी संख्या असलेल्या सर्वसाधारण शाळा २८० असुन त्यावर अधिक २८० पूर्णवेळ ग्रंथपालांना कार्यभार अनुज्ञेय होईल. तसेच ३००० पेक्षा अधिक विद्यार्थी संख्या असलेल्या ५३ शाळा आहेत. त्यामध्ये १०६ पूर्णवेळ ग्रंथपालांचा कार्यभार अनुज्ञेय होईल. अशा पद्धतीने एकुण (२८० व १०६ मिळुन ३८६ ) ३८६ पूर्णवेळ ग्रंथपालांचा कार्यभार अनुज्ञेय होईल. या शाळांमध्ये उपलब्ध झालेल्या पूर्णवेळ ग्रंथपाल पदांवर प्राथम्याने अर्धवेळ ग्रंथपालांपैकी ३८६ अर्धवेळ पूर्णवेळ ग्रंथपालांचे उन्नयन (रूपांतरण) होऊ शकेल. या पदांवर अर्धवेळ ग्रंथपालांचे उन्नयन झाल्यानंतर राज्यातील उपलब्ध असलेल्या २११८ पूर्णवेळ ग्रंथपालांच्या पदांच्या मर्यादेत शासनास संदर्भाधिन क्रमांक ४ अन्वये प्राप्त झालेल्या अहवालाच्या आधारे दोन व तीन शाळा एकत्रित करुन शाळा मॅपिंग अहवालानुसार १००१ विद्यार्थी संख्येचा निकष पूर्ण झाल्यानंतर उपलब्ध होणाऱ्या पदांवर सर्वप्रथम उर्वरित अर्धवेळ ग्रंथपालांचे उन्नयन (रुपांतरीत) करण्यास तसेच या कार्यवाहीनंतर शिल्लक राहिलेल्या अर्धवेळ ग्रंथपालांचे टप्प्याटप्प्याने पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन (रुपांतरण) करण्यास पुढील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:

१. अर्धवेळ ग्रंथपालांच्या सेवा ज्येष्ठतेनुसार पुर्णवेळ पदांवर उन्नयन (रुपांतरण) ची कार्यवाही करण्यात यावी.
२. पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन (रूपांतरण) होणाऱ्या अर्धवेळ ग्रंथपालाची अर्धवेळ ग्रंथपाल पदावरील सलग सेवा किमान ५ वर्षे पूर्ण झालेली असावी.
३. मंजूर अर्धवेळ ग्रंथपालाच्या पदावर अर्हताप्राप्त व्यक्तीची अर्धवेळ ग्रंथपाल म्हणून नियमानुसार नियुक्ती झालेली असेल व अशा नियुक्तीस सक्षम प्राधिकाऱ्याने मान्यता दिलेली असेल अशाच अर्धवेळ ग्रंथपालांचे उन्नयन (रूपांतरण) करण्यात येईल.
४. अर्धवेळ ग्रंथपाल पद हे आरक्षण धोरणानुसार भरलेले असावे.
५. सदर ग्रंथपालांना ग्रंथपाल पदाच्या किमान वेतन टप्प्यावर नियुक्ती देण्यात यावी.

६. अर्धवेळ पदासाठी केलेली सेवा पूर्णवेळ पदावरील आगावू वेतनवाढीकरीता ग्राह्य धरली जाऊ नये.

७. सदर कर्मचाऱ्यांना अर्धवेळ ग्रंथपालाचे पद पूर्णवेळ ग्रंथपाल म्हणून रूपांतरीत झाल्याच्या शासन निर्णयापासून वेतन व इतर लाभ देय राहतील. पूर्वलक्षी प्रभावाने लाभ लागू होणार नाहीत.

८. नवीन कोणतीही पदनिर्मिती करण्यात येणार नाही किंवा रिक्त असलेल्या अर्धवेळ ग्रंथपाल/ पूर्णवेळ ग्रंथपाल पद नव्याने भरता येणार नाही.

९. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) हे वर निश्चित करण्यात आलेल्या अटी व शर्तींच्या अधिन राहून उक्त अर्धवेळ ग्रंथपालांना पूर्णवेळ ग्रंथपाल पदी अनुज्ञेय वेतनश्रेणीत नियुक्ती करण्याबाबत तात्काळ कार्यवाही करतील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाचा सांकेतांक २०२३०४१३२०१७३७३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.04.13 20:25:20 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
५. संचालक माहिती व जन संपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. शिक्षण संचालक (प्रौढ शिक्षण),महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.संचालक, महाराष्ट्र राज्य, शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण पिषद पुणे
११.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,
१२.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१३.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१४.सर्व शिक्षणाधिकारी प्राथमिक/माध्यमिक/प्रौढ जिल्हा परिषद
१५.सर्व मुख्याधिकारी नगरपालिका/नगर परिषद
१६.सर्व प्रशासन अधिकारी नगर परिषद कटक मंडळे
१७. शिक्षण निरीक्षक (पश्चिम/दक्षिण/उत्तर), बृहन्मुंबई
१८. निवडनस्ती (टीएनटी-२ कार्यासन).